RNI No. MAHBIL/2009/31743

Reg.No.MH/MR/South-321/2010-12

# महाराष्ट्र शासन राजपत्र

## भाग चार-ब

वर्ष ४, अंक ३१] गुरुवार ते बुधवार, ऑक्टोबर ११-१७, २०१२/आश्विन १९-२५, शके १९३४ [ पृष्ठे १६

किंमत : रुपये ६.००

## प्राधिकृत प्रकाशन

**महाराष्ट्र शासनाने महाराष्ट्र अधिनियमान्वये तयार केलेले (भाग एक, एक-अ आणि एक-ल यांमध्ये प्रसिद्ध केलेले नियम व आदेश यांव्यतिरिक्त) नियम व आदेश.**

### गृह विभाग

जागतिक व्यापार केंद्र, सेंटर-१ कफ परेड, मुंबई ४०० ००५,

दिनांक ८ ऑक्टोबर २०१२

**आदेश**

**मुंबई राज्य राखीव पोलीस बल अधिनियम, १९५१.**

क्रमांक आरटीआर ०३१२/प्र.क्र. २३४/पोल-५अ.—मुंबई राज्य राखीव पोलीस बल अधिनियम, १९५१ (१९५१ चा मुंबई ३८) च्या कलम-२१ (२) (क) आणि त्या अनुषंगाने प्रदान करणाऱ्या इतर सर्व अधिकारांचा वापर करून आणि या संदर्भात अस्तित्त्वात असलेले संबंधित सर्व विद्यमान नियम, आदेश किंवा अनुदेश अधिक्रमित करून याद्वारे महाराष्ट्र शासन, महाराष्ट्र राज्यातील गृह विभागाच्या अख्यत्यारीतील राज्य राखीव पोलीस बलातील सशस्त्र पोलीस शिपाई (पुरुष) या पदाच्या सेवाभरतीचे विनियमन करणारे पुढील नियम करीत आहे, जसे :-

१. या नियमांना महाराष्ट्र राज्य राखीव पोलीस बलातील सशस्त्र पोलीस शिपाई (पुरुष) (सेवाप्रवेश) नियम, २०१२ असे संबोधण्यात यावे.

२. या अधिनियमान्वये संदर्भानुसार दुसरा अर्थ अभिप्रेत नसेल तर,—

(अ) "विभाग" म्हणजे शासनाचा गृह विभाग ;

(ब) "महासंचालक" म्हणजे पोलीस महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई ;

(क) "शासन" म्हणजे महाराष्ट्र शासन ;

(ड) " पोलीस दल " म्हणजे मुंबई पोलीस अधिनियम, १९५१ (१९५१ चा मुंबई २२) च्या कलम-३ अन्वये विहित करण्यात आलेले पोलीस दल.

३. (१) महाराष्ट्र राज्य राखीव पोलीस बलातील सशस्त्र पोलीस शिपाई (पुरुष) या पदावरील निवडीसाठी उमेदवारांकडे खालील नमूद वय, शैक्षणिक व शारीरिक पात्रता असणे आवश्यक आहे :--

(अ) **वय.**—कमीत कमी १८ वर्षे व जास्तीत जास्त २५ वर्षे (मागासवर्गीय उमेदवारांच्या बाबतीत शासनाने वेळोवेळी ठरविलेल्या धोरणानुसार उच्चतम वयोमर्यादेत सूट देय राहिल.)

(ब) **शैक्षणिक अर्हता.**—महाराष्ट्र माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळे अधिनियम, १९६५ (सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम, (४१) अन्वये प्रस्थापित केलेल्या विभागीय मंडळाकडून घेण्यात येणारी उच्च माध्यमिक शाळा प्रमाणपत्र परीक्षा (इयत्ता १२ किंवा शासनाने या परीक्षेस समकक्ष म्हणून घोषित केलेली परीक्षा उत्तीर्ण असणे आवश्यक आहे.

(क) **शारीरिक पात्रता.**—

(१) उंची : १६८ से. मी. पेक्षा कमी नसावी

(२) छाती : न फुगवता ७९ से. मी. पेक्षा कमी नसावी व न फुगवलेली छाती व फुगवलेली छाती यातील फरक ५ से. मी. पेक्षा कमी नसावा.

(२) **शैक्षणिक व शारीरिक पात्रतेत द्यावयाची सूट.**——

**(अ) नक्षलग्रस्त भागासाठी विशेष तरतूद.**——

(१) **शैक्षणिक अर्हता.**——शासनाने घोषित केलेल्या नक्षलग्रस्त भागातील रहिवाशी असलेले अनुसूचित जमातीचे उमेदवार किंवा नक्षलवाद्यांच्या हल्ल्यात अथवा नक्षलवादीविरोधी कारवाईत मृत अथवा गंभीर जखमी झालेल्या पोलीस बातमीदार, पोलीस पाटील अथवा पोलीस कर्मचारी यांची मुले असलेलेल उमेदवार जे इयत्ता ७वी परीक्षा उत्तीर्ण झालेले आहेत ते भरती करता पात्र ठरतील. मात्र असे उमेदवार नक्षलग्रस्त भागाच्या बाहेर बदलीसाठी पात्र असणार नाहीत.

(२) **शारीरिक पात्रत.**——शासनाने घोषित केलेल्या नक्षलग्रस्त भागातील रहिवाशी असलेले अनुसूचित जमातीचे उमेदवार किंवा नक्षलवाद्यांच्या हल्ल्यात अथवा नक्षलविरोधी कारवाईत मृत किंवा गंभीर जखमी झालेल्या पोलीस बातमीदार अथवा पोलीस पाटील अथवा पोलीस कर्मचारी याच्या मुलांमधील उमेदवाराच्या बाबतीत खालील नमूद केल्याप्रमाणे शारीरिक पात्रता शिथील करण्यात येईल :—

(अ) उंची : २.५ से. मी.

(३) या नियमातील उप खंड (अ) व (ब) नुसार विहित केलेल्या शैक्षणिक अर्हता व शारीरिक पात्रता शासनाने घोषित केलेल्या नक्षलग्रस्त भागातील रहिवाशी असलेल्या उमेदवाराच्या बाबतीत शिथिल करण्याचे अधिकार अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना राहतील.

(४) शासनाने घोषित केलेल्या नक्षलग्रस्त भागाती पोलीस भरतीच्या वेळी स्थानिक आदिवासी भागात बोलली जाणारी बोली भाषा (Local Tribal Dialect) अवगत असणाऱ्या उमेदवारांना प्राधान्य देण्यात येईल.

**(ब) पोलीस बँड**

(१) **शैक्षणिक अर्हता.**—बँड पथकासाठी महाराष्ट्र माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळे अधिनियम, १९६५ (सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम, ४१) अन्वये प्रस्थापित केलेल्या विभागीय मंडळाकडून घेण्यात येणारी माध्यमिक शाळा प्रमाणपत्र (इयत्ता १० वी) परीक्षा उत्तीर्ण.

(२) **शारीरिक पात्रता.**—बँड पथकाच्या भरतीसाठी आलेल्या उमेदवारांच्या बाबातीत या नियमाच्या उपनियम (१) खंड (क), उपखंड (*i*) व (*ii*) मध्ये विहित केलेल्या शारीरिक पात्रतेमध्ये खालीलप्रमाणे सवलत देण्याचे अधिकार अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना राहतील :—

(अ) उंची : २.५ से. मी.

(ब) छाती : २.५ से. मी. न फुगवता १.५ से. मी. फुगवून

(३) **अनुभव व इतर अटी.**—(अ) बँड पथकातील पदासाठी अर्ज करणाऱ्या उमेदवारांना बँड पथकातील वाद्यांची माहिती असणे व वाद्य वाजविण्याची अनुभव असणे आवश्यक राहिल.

(ब) राज्य राखीव पोलीस बलातील पोलीस बँड पथकासाठी निवड करण्यात आलेल्या उमेदवारांना पोलीस मुख्यालयातील अन्य कर्तव्यही बजावणे आवश्यक राहिल.

(क) राज्य राखीव पोलीस बलातील पोलीस बँड पथकासाठी निवड करण्यात आलेले उमेदवार कार्यकारी शाखेत बदलीसाठी पात्र असणार नाहीत. मात्र हे उमेदवार जिल्ह्याच्या बाहेर फक्त इतर पोलीस घटकातील बँड पथकात बदलीसाठी पात्र ठरतील.

**(क) खेळाडू प्रवर्ग.**—आवश्यक पात्रतेच्या इतर अटी व शर्ती पूर्ण करणाऱ्या खेळाडूंना किमान उंचीच्या अटीमध्ये २.५ से.मी. इतकी सूट देय राहिल.

**(ड) राज्य राखीव पोलीस बलातील कर्मचाऱ्यांच्या कुटुंबियाबाबत.**—राज्य राखीव पोलीस बलातील बेपत्ता कर्मचारी किंवा वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या प्रमाणपत्रानुसार ज्यांना वैद्यकीय कारणास्तव सेवानिवृत्त करण्यात आले आहे अशा कर्मचाऱ्यांच्या एकाच पात्र नातेवाईकास राज्य राखीव पोलीस भरतीसाठी खालील नमूद केल्याप्रमाणे शारीरिक पात्रत शिथिल करण्यात येईल :—

(१) उंची : २.५ सें. मी.

(२) छाती : २.५ से. मी. न फुगवता १.५ से. मी. फुगवून

**खुलासा.**—पात्र नातेवाईक यामध्ये राज्य राखीव पोलीस बलातील पोलीस कर्मचाऱ्याच्या खालील कुटुंबियांचा सामावेश असेल.

(अ) मुलगा

(ब) अविविहित कर्मचाऱ्यांच्या बाबतीत सर्वस्वी अवलंबून असणारा अविवाहित भाऊ.

४. **(१) शारीरिक चाचणी (१०० गुण).**—जे उमेदवार विहित शारीरिक व शैक्षणिक पात्रता पूर्ण करीत असतील अशा उमेदवारांना चाचणी द्यावी लागेल. शारीरिक चाचणी पुढीलप्रमाणे एकूण १०० गुणांची असेल:—

| | |
|---|---|
| (अ) ५ कि. मी. धावणे | ५० गुण |
| (ब) १०० मी. धावणे | २५ गुण |
| (क) लांब उडी | २५ गुण |
| एकूण | १०० गुण |

**(२) लेखी चाचणी (१०० गुण).**—(अ) जे उमेदवार शारीरिक पात्रता चाचणीत किमान ५० टक्के गुण मिळवून पूर्ण करतील त्यांच्यापैकी गुणवत्ता क्रमानुसार प्रसिद्ध केलेल्या जाहिरातीत प्रवर्गनिहाय नमूद केलेल्या पदसंख्येच्या १:१५ या प्रमाणात प्रवर्गनिहाय उमेदवारांना १०० गुणांच्या लेखी परीक्षेस पात्र ठरविण्यात येईल.

(ब) लेखी चाचणीमध्ये खालील विषयांचा समावेश असेल :—

(१) अंकगणित

(२) सामान्यज्ञान व चालू घडामोडी

(३) बुद्धीमत्ता चाचणी

(४) मराठी व्याकरण

(क) लेखी चाचणीचा, कालावधी ९० मिनिटांचा असेल व लेखी चाचणी मराठी भाषेत घेण्यात येईल. सर्व प्रश्न बहुपर्यायी स्वरुपाचे राहतील.

**स्पष्टीकरण.**—जे उमेदवार शारीरिक पात्रता चाचणीत किमान ५० टक्के गुण मिळवून पूर्ण करतील त्यांच्यापैकी गुणवत्ता क्रमानुसार प्रसिद्ध केलेल्या जाहिरातीत प्रवर्गनिहाय नमूद केलेल्या पदसंख्येच्या १:१५ या प्रमाणात प्रवर्गनिहाय उमेदवारांना लेखी परीक्षेसाठी पात्र ठरविण्यात येईल. उदाहरणार्थ, जर अनुसूचित जाती प्रवर्गासाठी १० जागा व अनुसूचीत जमाती प्रवर्गासाठी ५ असतील तर अनुसूचित जाती प्रवर्गातील १५० (१५×१०=१५०) उमेदवार व अनुसूचित जमाती प्रवर्गातील ७५ (१५×५=७५) उमेदवार लेखी चाचणीसाठी पात्र ठरतील. तथापि, अनुसूचित जाती प्रवर्गातील गुणानुक्रमे १५० व्या क्रमांकावर असलेल्या उमेदवारास मिळालेले गुण जेवढ्या अनुसूचीत जाती प्रवर्गातील उमेदवारांना मिळालेले असतील ते सर्व उमेदवार अनुसूचित जाती प्रवर्गांतर्गत लेखी चाचणीसाठी पात्र असतील. तसेच अनुसूचित जमाती प्रवर्गातील गुणानुक्रमे ७५ व्या क्रमांकावर असलेल्या उमेदवारास मिळालेले गुण जेवढ्या अनुसूचित जमाती प्रवर्गातील उमेदवारांना मिळाले असतील ते सर्व उमेदवार अनुसूचित जमाती प्रवर्गांतर्गत लेखी चाचणीसाठी पात्र असतील.

(३) महासंचालकांनी प्रत्येक राज्य राखोल पोलीस बल गटासाठी गठित केलेले निवड मंडळ या नियमाच्या पोट-नियम (१) व (२) मध्ये नमूद केलेल्या दोन निकषांवरून प्राप्त एकत्रित गुणांच्या आधारे उमेदवारांची गुणवत्ता यादी तयार करील. शारीरिक चाचणी व लेखी चाचणी यामध्ये प्राप्त होणारे गुण एकत्र केल्यानंतर, उमेदवारांची अंतिम गुणवत्ता यादी सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक-एस-आरक्षो-१०९७/प्र.क्र. ३१/९८/१६-अ, दिनांक १६ मार्च १९९९ च्या शासन परिपत्रकामध्ये दिलेल्या टप्प्यानुसार तसेच शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार तयार करण्यात येईल.

५. **चारित्र्य व पूर्वचारित्र्य पडताळणी.**—राज्य राखीव पोलीस बलातील सशस्त्र पोलीस शिपाई पदावर निवड झालेल्या उमेदवारांचे चारित्र्य व पूर्वचारित्र्य पडताळणी अहवाल प्राप्त झाल्याशिवाय या उमेदवारांची नियुक्ती करण्यात येऊ नये तसेच त्यांना प्रशिक्षणासाठीही पाठविण्यात येऊ नये. ज्या उमेदवारांविरुद्ध गुन्हा दाखल आहे अथवा खटला न्यायप्रविष्ट आहे किंवा ज्या उमेदवारांविरुद्ध दाखल खटल्यातून उमेदवारांची भरतीपूर्वी किंवा भरतीनंतर निर्दोष मुक्तता झालेली आहे अशा उमेदवारांना नियुक्ती देण्यात येऊ नये. अशा उमेदवारांना नियुक्ती देण्यासंदर्भातील सर्व प्रस्ताव शासनस्तरावर गठित उच्चस्तरीय समितीपुढे विनाविलंब विचारार्थ सादर करणे नियुक्ती प्राधिका-यावर बंधनकारक राहिल.

६. **वैद्यकीय तपासणी.**—निवड झालेल्या उमेदवारांची वैद्यकीय तपासणी संदर्भात महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम, १९८१ मधील तरतुदी तसेच शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या तरतुदी लागू होतील. याशिवाय वैद्यकीय चाचणीत दृष्टीदोष, तिरळेपणा, रातआंधळेपणा, वर्णांधतेपणा, गुढग्यास गुढगा लागणे, सपाट तळवे, त्वचारोग, छातीचे रोग व महासंचालकांनी वेळोवळी विहित केलेल्या वैद्यकीय चाचण्यांचा समावेश असेल. या चाचण्यांमध्ये उमेदवारात दोष आढळल्यास अथवा उम्मेदवार अपात्र ठरल्यास त्यास नियुक्ती देण्यात येणार नाही.

७. **भरती जाहिरात.**—राज्य राखीव पोलीस बलातील सशस्त्र पोलीस शिपाई या पदाच्या भरतीसाठी संबंधित सेवायोजन कार्यालय किंवा समाजकल्याण अधिकारी किंवा जिल्हा सैनिक बोर्ड किंवा आदिवासी विकास विभागामार्फत चालविल्या जाणा-या प्रशिक्षण केंद्राच्या संबंधित कार्यालयाकडून तसेच सामान्य प्रशासन विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशांच्या अनुषंगाने मराठी, हिंदी, उर्दू व इंग्रजी भाषेतील मोठ्या प्रमाणावर प्रसारण असलेल्या स्थानिक वर्तमानपत्रात जाहिरात देऊन तसेच प्रसार माध्यमातून प्रसिद्धी देऊन उमेदवारांची नावे/अर्ज मागविण्यात येतील. याव्यतिरिक्त भरतीबाबतची माहिती पोलीस वेबसाईट आणि पोलीस कार्यालयातील नोटीस बोर्डावर दिली जाईल. तसेच रेडीओ, दूरदर्शन, रोजगार वार्तापत्र आणि वर्तमानपत्रात दिली जाईल. राज्यात सर्व पोलीस घटकांमध्ये एकाचवेळी भरती प्रक्रिया सुरू करण्यात येईल. पोलीस महासंचालक हे भरती प्रक्रियेचा दिनांक निश्चित करतील. अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, मुंबई यांनी विहित केलेले अर्ज प्रत्येक उमेदवाराने सशस्त्र पोलीस शिपाई पदासाठी भरणे अनिवार्य राहिल. यासाठीचे

अर्ज सर्व पोलीस आयुक्त किंवा जिल्हा पोलीस अधीक्षक किंवा समादेशक, राज्य राखील पोलीस बल किंवा तालुका पोलीस ठाणे यांच्या कार्यालयामार्फत उपलब्ध करून देण्यात येतील. पोलीस भरती प्रक्रिया कशा प्रकारे राबविण्यात येईल यासंदर्भात शासनाने वेळोवेळी विहित केलेली कार्यपद्धती अवलंबिण्यात येईल.

८. **आरक्षण**

**(अ) खेळाडू प्रवर्ग.**--शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या शासन निर्णयानुसार उपलब्ध पदांच्या ५ टक्के पदे खेळाडुंसाठी राखीव असतील. सदर आरक्षण शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक-राक्रीधो. २००२/प्र.क्र. ६८/क्रीयुसे-२, दिनांक ३० एप्रिल २००५ आणि त्यानंतर शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशान्वये निर्धारित केलेल्या अटी व शर्तीनुसार असेल.

**(ब) गृहरक्षक दल.**--राज्य राखील पोलीस बलातील सशस्त्र पोलीस शिपाई पदांवर नियुक्त करताना एकुण पदांच्या ५ टक्के पदे होमगार्डमध्ये जाहिरातीच्या दिनांकास कमीत कमी ३ वर्ष (१०९५ दिवस) एकत्रित सेवा झालेल्या व या नियमानुसार सशस्त्र पोलीस शिपाई पदासाठी आवश्यक शैक्षणिक व शारीरिक पात्रता पूर्ण करणा-या, विहित वयोमर्यादेतील होमगार्डसमधून भरण्यात येतील.

**(क)** माजी सैनिक, धरणग्रस्त प्रकल्पग्रस्त व इतर विविध घटकातील उमेदवारांकरिता शासनाने वेळोवेळी दिलेल्या निदेशानुसार आरक्षण लागू राहिल.

**(ड)** या नियमात विहित करण्यात आलेल्या सर्व प्रवर्गातील उमेदवारांना पात्रता निकष पूर्ण करणे आवश्यक राहिल आणि या पदासाठी शारीरिक चाचणी व लेखी चाचणीमध्ये विहित केलेले गुण मिळवावे लागतील.

९. **अनुकंपातत्त्वावरील नियुक्ती.**---अनुकंपा नियुक्तीच्या योजनेसंदर्भात सामान्य प्रशासनाने विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशान्वये निर्धारित केलेली कार्यपद्धती अवलंबिण्यात यावी.

मात्र यासंदर्भात पात्र उमेदवारांसाठी खालील नमूद केल्याप्रमाणे शारीरिक पात्रता शिथिल करण्यात येईल:--

(अ) उंची : २.५ से. मी.

(ब) छाती : २ सें. मी. न फुगवता १.५ से. मी. फुगवून

१०. सशस्त्र पोलीस शिपाई या पदावर नेमणूक झालेल्या व्यक्तीला, उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल तर, हिंदी व मराठी भाषा त्यासंबंधी केलेल्या नियमानुसार उत्तीर्ण व्हाव्या लागतील.

११. राज्य राखील पोलीस बलातील सशस्त्र पोलीस शिपाई पदावर उमेदवार ज्या राखीव पोलीस बल गटामध्ये नियुक्ती देण्यात आलेलो आहे त्या गटामध्ये ५ वर्ष सेवा कालावधी पूर्ण झाल्यानंतर

तो इतर गटात बदली होण्यास पात्र असेल, तसेच शासन परिपत्रक, गृह विभाग क्रमांक-एसआरएफ/०९००/२२३६/प्र.क्र.६६/पोल-३, दिनांक १९ सप्टेंबर २००१ आणि शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशान्वये निर्धारित केलेल्या अटी, शर्ती व तरतुदीनुसार सेवाज्येष्ठतेप्रमाणे जिल्हा पोलीस दलात बदली होण्यास तो पात्र असेल.

**१२.** सशस्त्र पोलीस शिपाई या पदावर नियुक्त केलेल्या उमेदवारास या पदासाठी विहित केलेले प्रशिक्षण पूर्ण करावे लागेल व संबंधित परीक्षा चार संधीमध्ये उत्तीर्ण व्हावे लागेल. जर चार संधीमध्ये तो परीक्षा उत्तीर्ण झाला नाही तर त्याची सेवा समाप्त करण्यात येईल. या कालावधीत वार्षिक वेतनवाढ अनुज्ञेय असणार नाहीत.

**१३.** सशस्त्र पोलीस शिपाई या पदावर नियुक्त केलेल्या उमेदवारांना मुंबई पोलीस मॅन्युअल १९५९, मुंबई पोलीस (शिस्त व अपील) नियम, १९५६ व राज्य शासनाने वेळोवेळी विहित केलेले अन्य नियम लागू होतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**सु. ग. सोनवणे,**
शासनाचे उप सचिव.

## HOME DEPARTMENT

World Trade Center, Center-1, Cuff Parade,
Mumbai 400 005, dated the 8th October 2012

### Order

BOMBAY STATE RESERVE POLICE FORCE ACT, 1951.

No. RTR-0312/CR-234/POL-5A.—In exercise of the powers conferred by clause (*c*) of sub-section (*2*) of section 21 of the Bombay State Reserve Police Force Act, 1951 (Bom.XXXVIII of 1951), and of all other powers enabling it in that behalf and in suppression of all existing orders, rules or instrument made in this behalf, and in force in the State of Maharashtra or any part thereof, the Government of Maharashtra hereby makes the following rules regulating recruitment to the post of Armed Police Constable (Male) in the State Reserve Police Force under the Home Department of Government of Maharashtra, namely :—

1. These rules may be called the Armed Police Constables (Male) in Maharashtra State Reserved Police Force (Recruitment) Rules, 2012.

2. In these rules, unless the context requires otherwise :—

(*a*) ' Department ' means the Home Department of the Government ;

(*b*) ' Director General ' means the Director General and Inspector General of Police, Maharashtra State, Mumbai ;

(*c*) ' Government ' means the Government of Maharashtra ;

(*d*) ' Police Force ' means the Police Force constituted under section 3 of the Bombay Police Act, 1951 (Bom. XXXVIII of 1951) ;

3. *(1)* A candidate for selection to the post of Armed Police Constable (Men) in the State Reserved Police Force shall be required to possess, the educational and physical qualifications, as follows, namely :-

(*A*) ***Age.***- Minimum 18 years and maximum 25 years.

(*Maximum age Limit in respect of Backward Class candidate shall be relaxable as per the Government Policy laid down in this regard, from time to time.*)

(*B*) ***Educational qualification.***-Passed the Higher Secondary School certificate Examination (XII th Standard) Conducted by a Divisional Board under the Maharashtra Secondary and Higher Secondary Eduacation Boards Act, 1965 (Mah. XLI of 1965), and

includes any other examinations declared by the Government to be equivalent thereto.

(C) ***Physical Qualification.–***

| | |
|---|---|
| (*i*) Height | Shall not be less than 168 centimeters. |
| (*ii*) Chest | Shall not be less than 79 centimeters deflated and the difference between deflated chest and expanded chest shall not be less than 5 centimeters. |

***(2) Relaxations in educational and physical qualifications.–***

(*A*) Special provisions for naxal affected areas.–

(*a*) ***Educational qualification.–*** Candidates belonging to the Scheduled Tribes category or children of Police Informants. Police Patils or Policemen who are killed or seriously injured in Naxalite attacks or operations against Naxalites, and have passed VIIth standard examination ; and are residing in areas notified by the Government as Naxalite areas, shall be eligible for recruitment on the condition that such a candidate shall not be entitled to transfer outside the said Naxalite areas.

(*b*) ***Physical qualification.–*** Relaxations for the candidate belonging to the Scheduled Tribes category or children of Police Informants or Police Patils or Policemen who are killed or seriously injured in Naxalite attacks or operations against Naxalites and who are residing in the areas notified by the Government as Naxalite areas, are enumerated to the extent as set out below,–

(*i*) ***Height.***–2.5 centimeters.

(*c*) The power of relaxation in educational and physical qualifications prescribed in cub-clauses (*a*) and (*b*) above in respect of candidates residing in the Naxalite areas notified by the Government shall lie with the Additional Director General, Training and Special Unit, Maharashtra State.

(*d*) In the Naxalite area notified by the Government, preference will be given to the candidates having knowledge of one of the local tribal dialects.

(B) ***Police Band.–***

(*a*) ***Educational qualification.–*** Candidates who have passed Secondary School Certificate Examination (Xth Standard) conducted by

the Divisional Board under the Maharashtra Secondary and Higher Secondary Education Boards Act, 1965 (Mah. XLI of 1965), shall be eligible for recruitment.

(*b*) ***Physical qualification.***- The Additional Director General, Training and Special Unit, Maharashtra State may relax the Physical qualifications prescribed in sub-clauses (*i*) and (*ii*) of clause (*C*) of sub-rule (*1*) of these rule in favour of candidates who appear for recruitment in the Police Band to the extent as set out below,—

(*i*) ***Height*** - 2.5 centimeters.

(*ii*) ***Chest*** - 2 centimeters deflated and 1.5 centimeters expanded.

(*c*) ***Experience and other conditions.—***

(*i*) knowledge of instruments of brass band and experience in playing of musical instruments is necessary for recruitment in the Police Band ;

(*ii*) police personnel recruited in the Police Band in State Reserve Police Force will also have to perform other police duties at the Police Head Quarters ;

(*iii*) police personnel recruited in the Police Band in State Reserve Police Force will not be eligible for transfer to executive duties but will be eligible for inter-district transfer in the same cadre, i.e. in a Band unit.

(C) ***Sports category.***- Relaxation in the required height by 2.5 centimeters, shall be given to the sports persons, who fulfill the other required eligibility conditions.

(D) ***Policeman's family in State Reserve Police Force.-***

Only one eligible relative of missing State Reserve Police Force Policemen or of those who have been retired on the ground of medical reasons as per the certificate given by medical officer, will be eligible for the following relaxations, namely :-

(*a*) ***Height*** - 2.5 centimeters.

(*b*) ***Chest*** - 2 centimeters deflated and 1.5 centimeters expanded.

***Explanation :-*** The following family members of the State Reserve Police Force policeman will be considered to be an eligible relative for the purpose of this clause.—

*(a) Son.*

*(b) Dependable unmarried brother in case of such unmarried Policeman.*

4. (1) ***Physical Test (100) Marks.***– The candidate who fulfill the physical and educational qualifications shall be required to appear for a physical fitness test. The physical test will be of a total 100 marks as follows, namely:–

| | | |
|---|---|---|
| (*a*) 5 Kilometers running | ... ... | 50 marks |
| (*b*) 100 meters running | ... ... | 25 marks |
| (*c*) Long Jump | ... ... | 25 marks |
| | **Total ...** | **100 marks** |

(2) ***Written Test (100 marks).***–

(A) Candidates securing a minimum of 50 % marks in the Physical Fitness Test shall be eligible to be called to appear for a written test of 100 marks in the ratio of 1:15 of vacancies advertised in the respective categories.

(B) The Written Test will include the following subjects, namely:–

(i) Arithmetic ;

(ii) General Knowledge and Current Affairs ;

(iii) Intellectual Test ;

(iv) Marathi Grammar.

(C) The questions asked in written test shall be objective type and Conducted in Marathi language. The duration of written test will be 90 minutes.

***Explanation.***—Candidates securing a minimum of 50% marks in the physical fitness test shall be eligible to be called to appear for a written test in the ratio of 1:15 of vacancies advertised in the respective categories. If, for example, there are 10 vacancies in the Schedule Caste category and 5 vacancies in the Scheduled Tribes category, then 150 (15 × 10 = 150) candidates will be listed on merit in Schedule Caste category and 75 (15 × 5 = 75) candidate, will be listed in the Schedule Tribes category. However, all candidates in the Schedule Caste category who have secured the same marks as the Schedule Caste candidate at the 150th rank shall be eligible to be called to appear for a written test. Similarly, all Scheduled Tribes category candidates who have secured the same marks as the Scheduled Tribes candidate ranking 75th will be eligible to be called to appear for a written test.

(3) The Selection Board constituted by the Director General shall prepare a merit list from amongst the candidates based on the results of the two criteria enumerated at sub-rules (1) and (2) of this rule. After

amalgamation of marks obtained in physical and written test, the final merit list will be prepared as per steps mentioned in the General Administration Department's Government Resolution No. SRV - 1097/ CR-31/98/16A, dated 16th March 1999 and any subsequent orders issued by Government, from time to time.

5. ***Verification of antecedents or character.***– The candidates selected for the post of Armed Police Constable in the State Reserve Police Force shall not be given appointment or shall not be sent of training till the report of his character is obtained. The appointment shall not be given to the candidates against whom offence is registered or a case is pending or who have been acquitted by court before or after recruitment. It will be obligatory for appointing authority to send all such proposal for consideration before the High Power Committee of Government.

6. ***Medical test.***– The medical test of selected candidates shall be done as per the provisions of Maharashtra Civil Services (General Conditions of Services) Rules, 1981 and as per subsequent orders, issued by the Government, from time to time. In addition, the medical test shall consists of test for squint eye, colour blindness, knock-knees, flat-foot and skin and chest diseases and any other medical tests prescribed by the Director General, from time to time. The selected candidates who are not found fit in these medical tests shall not be given appointment.

7. ***Advertisement for Recruitment.***– Recruitment to the post of Armed Police Constable in the State Reserved Police Force shall be made by intimating and calling for names from the Employment Exchange or Social Welfare Officer or District Military Board and Training Centers conducted by the Tribal Development Department and inviting application after giving advertisement thereof in Marathi, Hindi, Urdu and English language local newspapers having wide circulation and giving wide publicity from time to time. In addition, information pertaining to the recruitment shall be posted on the police website and displayed on office notice boards or announced on radio, television, employment bulletins and newspapers. There shall be simultaneous recruitment in all Police Units in the State. The date shall be finalised by the Director General, Application Forms for this purpose shall be specified by the Additional Director General, Training and Special Unit of Police. Application Forms for this purpose shall be made available at the offices of the Commissioner of Police or District

Superintendent of Police or Commandant, State Reserve Police Force or Taluka Police Stations. The procedure to implement the recruitment drive will be implemented as per the direction given by the Government, from time to time.

8. ***Reservation.–***

(*i*) ***Sports category.–*** 5% of the total posts available for recruitment of police constables shall be reserved for sports persons. The terms and conditions governing this reservation shall be in consonance with the Education and Sports Department, Government Resolution, No. NSP–2002/CR–68/SYS–2, dated the 30th April 2005 and any subsequent orders issued by Government, from time to time.

(*ii*) ***Home Guards.–*** Out of the total post available for recruitment to the post of Armed Police Constable in the State Reserve Police Force, 5% posts shall be filled in from amongst the members of Home Guards who have completed minimum three years service i.e. 1095 days of consolidated service as Home Guards and possess the requisite educational and physical qualifications and age limit as per these rules.

(*iii*) Ex-servicemen, project affected persons and any other categories eligible as per the guidlines issued by the Government, from time to time.

(*iv*) All the categories enumerated in this rule shall be required to pass the eligibility criteria and obtain the requisite marks and the physical and written tests specified for the post.

9. ***Recruitment on compassionate ground.–*** The procedure for compassionate appointment scheme will be adopted as per the orders issued by the General Administration Department, from time to time.

But the eligible candidate may get the following relaxation in respect of physical qualifications, namely:–

(*i*) **Height.—**2.5 centimeters.

(*ii*) **Chest.—**2 centimeters deflated and 1.5 centimeters expanded.

10. A person appointment to the post shall be required to pass examinations in Hindi and Marathi according to the rules made in that behalf, unless he has already passed, or has been exempted from passing those examinations.

11. Appointed Armed Police Constable in the State Reserved Police Force shall be eligible for transfer from one State Reserved Police Force Groups to other after completion of 5 years in the group for which he was selected at the time of recruitment. He shall be eligible for transfer to other police districts as per the provisions of circular No. SRPF/0900/2236/CR-666/Pol-3, dated 1st September 2001 issued by the Home Department and any subsequent circular issued from time to time in this behalf.

12. A candidate appointed to the post shall be required to complete the training prescribed for the post and have to pass concerned examinations within four chances, failing which his services would stand terminated. During this period, annual increments due shall be forfeited.

13. The candidates appointed to the post shall be governed by the Bombay Police Manual, 1959, Bombay Police (Discipline and Appeal) Rules, 1956 and similar other rules prescribed by the Government, from time to time.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

S. G. SONAWANE,
Deputy Secretary to Government.